**महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मध्ये सहकारी गृहनिर्माण संस्थांसाठी स्वतंत्र प्रकरण समाविष्ट करण्यासंदर्भात अभ्यास करुन शासनास शिफारस करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीएसएल-२०१७/प्र.क्र. ११/१३-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक- १० फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना :**

राज्यात सहकारी गृहनिर्माण संस्थांची संख्या मोठया प्रमाणात असून, भविष्यात शहरीकरणामुळे त्यामध्ये अजून वाढ होणार आहे.सहकारी गृहनिर्माण संस्थांचे कामकाज व प्रश्न हे इतर सहकारी संस्थांपेक्षा भिन्न आहेत. या पार्श्वभूमीवर सहकारी गृहनिर्माण संस्थांचे कामकाज व त्याबाबतचे प्रशासन अधिक सुलभ, सुस्पष्ट व परिपूर्ण होण्याकरिता महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० मध्ये स्वतंत्र प्रकरणाचा अंतर्भाव करण्यासंदर्भात अभ्यास करून शिफारस करण्यासाठी समिती गठीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० मध्ये सहकारी गृहनिर्माण संस्थांसाठी स्वतंत्र प्रकरण समाविष्ट करण्यासंदर्भात अभ्यास करुन, शासनास शिफारस करण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | नांव | पदनाम | समितीवरील पदनाम |
|---|---|---|---|
| १. | श्री.संदीप देशमुख | सहनिबंधक,सहकारी संस्था,झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण , वांद्रे | अध्यक्ष |
| २. | श्री.मोहम्मद आरिफ, | विभागीय सहनिबंधक,सहकारी संस्था,मुंबई विभाग,मुंबई . | सदस्य |
| ३. | श्री.शेषराव सांगले, | सेवानिवृत्त अपर निबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| ४. | श्री.सुभाष पाटील, | सेवानिवृत्त सहनिबंधक,सहकारी संस्था | सदस्य |

| | | | |
|---|---|---|---|
| ५. | श्री.दिलीप उढाण, | जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था, ठाणे | सदस्य |
| ६. | श्री.राजकुमार पाटील, | उपनिबंधक, सहकारी संस्था बोरिवली | सदस्य |
| ७. | श्री.रमेश प्रभू , | अध्यक्ष,एम.एस.डब्ल्यू.ए.मुंबई | सदस्य |
| ८. | श्रीमती छाया आजगांवकर, | अध्यक्ष,हौसिंग फेडरेशन | सदस्य |
| ९. | श्री.सोपान शिंदे | उपनिबंधक,सहकार आयुक्त व निबंधक यांचे कार्यालय, पुणे. | सदस्य |
| १०. | श्री. कैलास जेबले, | उपनिबंधक,सहकारी संस्था,एन विभाग,मुंबई | सदस्य सचिव |

२. समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे:-

राज्यातील सहकारी गृहनिर्माण संस्थांचे कामकाज, व्यवस्थापन व सनियंत्रण इत्यादी सुलभ, सुस्पष्ट व परिपूर्ण होण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मध्ये समाविष्ट करावयाचे सर्वसमावेशक तरतूदी असलेले स्वतंत्र प्रकरण तयार करणे.

३. वरील (२) येथे नमूद स्वतंत्र प्रकरण तयार करतांना खालील बाबींचा अभ्यास करुन प्रकरणात आवश्यकतेप्रमाणे तरतूदींचा समावेश करावा:-

अ) मानीव अभिहस्तांतरणाच्या दृष्टीने जमिनीची मालकी हस्तांतरीत करण्यासंदर्भातील प्रचलित कायद्यांच्या तरतूदी.

ब) सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या कामकाजाच्या पद्धती व त्यांचे संनियंत्रण करण्यासाठी नियंत्रक/प्राधिकरण सहकारी गृहनिर्माण संस्था स्थापना करणे.

क) सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणुकीसंदर्भात प्रचलित तरतुदींमध्ये बदल सूचविणे.

ड) सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या इमारतीचे व्यवस्थापन व त्यांची दुरुस्ती याबाबत तसेच सभासदांच्या तक्रारी सोडविण्याबाबत करावयाच्या उपाययोजना.

इ) महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील सहकारी गृहनिर्माण संस्थांना लागू असलेल्या प्रचलित व कालबाह्य तरतूदी यांचा अभ्यास करुन, सहकार चळवळ जास्तीत जास्त लोकाभिमुख करण्याच्या दृष्टीकोनातून अधिनियमात अपेक्षित ते बदल करणे.

ई) सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या बाबतीत मा. न्यायालयाने वेळोवेळी दिलेले आदेश व सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या बाबतीत इतर कायद्यांतील तरतूदींचा अभ्यास करुन सहकारी गृहनिर्माण संस्थांना लागू असलेल्या बाबींचा यथोचित बदलासह सदर प्रकरणातील तरतूदींमध्ये अंर्तभाव करणे.

उ) वरील 'अ' ते 'ई' व्यतिरिक्त सहकारी गृहनिर्माण संस्थांचे स्वरुप जसे की, सदनिका, बंगले, भूखंड इत्यादीचा अभ्यास करुन अशा संस्थांसाठी समर्पक तरतूदी सदर प्रकरणात समाविष्ट करणे.

ऊ) सदर स्वतंत्र प्रकरणात समितीने अंर्तभूत केलेल्या तरतूदींच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६०, महाराष्ट्र मालकी हक्कांच्या सदनिकाबाबत (त्या बांधण्यास प्रोत्साहन देणे, यांची विक्री, व्यवस्थापन व हस्तांतरण यांचे नियमन करण्याबाबत) अधिनियम १९६३ (Maharashtra Ownership of Flats (Regulation of the promotion of construction, sale management and transfer) Act १९६३) किंवा इतर संबधित कायद्यांत करावयाचे अपेक्षित बदल सूचविणे व त्या अनुषंगाने करावयाच्या तरतूदीचा मसूदा तयार करणे.

४. वरीलप्रमाणे प्रकरण तयार करण्यासाठी सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या कामकाजात येणाऱ्या अडचणी व त्या सोडवण्यासाठी करावयाच्या उपाययोजनाबाबत राज्यातील सहकारी गृहनिर्माण संस्थाबाबतचे तज्ञ, अशा संस्थाशी संबंधित काम करणा-या सेवाभावी संस्था, तसेच इतर संघटना यांच्याशी समितीने सविस्तर चर्चा करावी.

५. सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या बाबतीत वरीलप्रमाणे प्रकरण तयार करण्याची जबाबदारी प्रभावीपणे पार पाडण्याच्या अनुषंगाने आवश्यतेप्रमाणे समितीस गृहनिर्माण संस्थेशी निगडित तज्ञ, विधिज्ञ इत्यादी यांना निमंत्रित करण्याची मुभा राहिल.

६. गृहनिर्माण सहकारी संस्थांच्या कामकाजाचे व्यापक स्वरुप पाहता गरजेनूसार बाबनिहाय किंवा विभागनिहाय अभ्यासासाठी उपगट स्थापन करता येतील.

७. वरील परिच्छेद क्र. २ येथे नमूद कार्यकक्षेच्या अनुषंगाने समितीने वेळोवेळी आयोजित केलेल्या बैठकांच्या इतिवृत्ताच्या प्रती तसेच विविध अधिनियमांत प्रस्तावित तरतूदीच्या मसूद्यासह महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मध्ये समाविष्ट करावयाच्या प्रकरणाचा मसूदा समिती गठित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्यामध्ये शासनास सादर करावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१३१२५२४९०००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Jayaram Choudhary

Digitally signed by Anil Jayaram Choudhary
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Anil Jayaram Choudhary
Date: 2017.02.13 12:56:49 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना माहितीसाठी अग्रेषित.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, जूनी मध्यवर्ती इमारत, तळ मजला, ५ बी.जे. रोड, पुणे, यांना माहितीसाठी अग्रेषित.
३. श्री.संदीप देशमुख, अध्यक्ष, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती तथा सहनिबंधक,सहकारी संस्था,झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण , वांद्रे
४. श्री.मोहम्मद आरिफ, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती तथा विभागीय सहनिबंधक,सहकारी संस्था,मुंबई विभाग,मुंबई .
५. श्री.शेषराव सांगले, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती तथा सेवानिवृत्त अपर निबंधक, सहकारी संस्था.
६. श्री.सुभाष पाटील, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती तथा सेवानिवृत्त सहनिबंधक,सहकारी संस्था.
७. श्री.दिलीप उढाण, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती तथा जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था, ठाणे.
८. श्री.राजकुमार पाटील, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती तथा उपनिबंधक, सहकारी संस्था बोरिवली.

९. श्री.रमेश प्रभू, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती तथा अध्यक्ष,एम.एस.डब्ल्यू.ए.मुंबई.
१०. श्रीमती छाया आजगांवकर, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती तथा सदस्य, अध्यक्ष,हौसिंग फेडरेशन
११. श्री. सोपान शिंदे, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती कखा उपनिबंधक, सहकार आयुक्त व सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. श्री.कैलास जेबले, सदस्य, सहकारी गृहनिर्माण संस्था अधिनियम अभ्यास समिती सदस्य सचिव, तथा उपनिबंधक,सहकारी संस्था,एन विभाग,मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४. उपसचिव (श्री. खोरगडे) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी, कार्यासन १४-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती.